**बेवारस मृतदेहाच्या अंत्यसंस्कारासाठी येणाऱ्या खर्चाच्या मर्यादेत वाढ करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
शासन निर्णय क्र.एमआयएस ०७०८/प्र.क्र.३५९/पोल-८
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक:- २१ मे, २००९

<u>वाचा:-</u> १) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र यांचे पत्र क्र.पोमसं/३३/७१२५/ अंत्यविधी खर्च/२१५/२००६, दिनांक ३०.०९.२००६

२) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांचे पत्र क्र.पोआ/कक्ष-२/१७/०६, दिनांक ०१.०१.२००६

**<u>प्रस्तावना :-</u>** मुंबई ही देशाची आर्थिक राजधानी असून देशाच्या कानाकोपऱ्यातून रोजगार मिळविण्यासाठी व इतर कामकाजासाठी शहरात माणसे दाखल होतात. शिवाय नैसर्गिक तसेच मानव निर्मित आपत्तीमुळे उदा.बॉम्बस्फोट, दंगली यामुळे अपमृत्यूच्या प्रमाणात वाढ होत आहे. या अपमृत्यूमुळे मोठ्या प्रमाणात बेवारस मृतदेह आढळतात. अशा बेवारस मृत्यूची विल्हेवाट लावण्याकरिता पोलीसांना कार्यवाही करावी लागते. ही कार्यवाही करण्यासाठी पोलीस मॅन्युअलमधील नियम २१२(१०) मध्ये प्रत्येक मृतदेहासाठी रु.८/- इतकी रक्कम खर्च करण्याची तरतूद आहे. परंतु प्रत्यक्षात मात्र याकरिता मोठ्या प्रमाणात (शववाहिनी, कपडा, हमाली, इत्यादीसाठी) इतका खर्च करावा लागतो. पोलीस महासंचालक यांनी महाराष्ट्र राज्यात दरवर्षी साधारण: ५,०००/- बेवारस मृतदेह आढळून येतात हे विचारात घेऊन पोलीस नियमावलीत सुधारणा करुन त्यासाठी प्रत्येक बेवारस मृतदेहाची विल्हेवाट लावण्यासाठी वाढीव तरतूद करण्यात यावी अशी विनंती केली होती. याशिवाय शासनाने बेवारस मृतदेहाची विल्हेवाट लावण्यासाठीच्या खर्चाच्या मर्यादेत वाढ करण्यात येईल असे आश्वासन दिले विधानमंडळात होते. या बाबी विचारात घेऊन बेवारस मृतदेहाची विल्हेवाट लावण्यासाठी होणाऱ्या खर्चात वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>** वरील सर्व बाबींचा सर्वांगीण विचार करुन मंत्रिमंडळाने दि. ४.२.२००९ रोजी घेतलेल्या निर्णयानुसार शासन याद्वारे महाराष्ट्र राज्यात आढळून येणाऱ्या बेवारस मृतदेहाची विल्हेवाट लावण्यासाठी पोलीस विभागातील सर्व कार्यालय प्रमुखांना प्रत्येक बेवारस मृत देहामागे रु.१,५००/- इतकी रक्कम मंजूर करण्यास खालील अटींच्या अधीन राहून याद्वारे मान्यता देत आहे.

(१) ज्या कार्यालय प्रमुखामार्फत ही रक्कम मंजूर केली जाणार आहे. त्या कार्यालय प्रमुखाने सदरहू मृतदेह बेवारस आहे याची खातरजमा करुन त्या बाबतीत सक्षम अधिकाऱ्याचे प्रमाणपत्र मिळवणे आवश्यक राहील.

(२) महाराष्ट्रातील रेल्वे प्रशासनाच्या हद्दीत आढळून येणाऱ्या बेवारस मृतदेहाची विल्हेवाट लावण्याची जबाबदारी ही रेल्वे प्रशासनाची असल्याने त्याची विल्हेवाट लावण्यासाठी झालेल्या खर्चाची रक्कम रेल्वेकडून घेण्याची कार्यवाही करण्यात यावी व ती संबंधीत लेखा शिर्षाखाली जमा करण्यात यावी.

(३) बेवारस मृतदेहाची विल्हेवाट लावण्यासाठी केलेल्या खर्चाची देयके संबंधिताकडून प्राप्त करुन घेण्यात यावीत व त्या आधारावरच रक्कम मंजूर करण्यात यावी.

(४) मृतदेह संबंधित अधिकाऱ्यांच्या बेजबाबदारपणामुळे बेवारस म्हणून घोषीत केल्याचे उघडकीस आल्यास ज्यांना प्रतिपूर्ती मंजूर करण्यात आली आहे त्यांच्याकडून ती वसूल करण्याची कार्यवाही करण्यात यावी.

२. यासाठी होणारा खर्च मागणी क्र. बी-१ , २०५५-पोलीस (००)१०९ जिल्हा पोलीस -(००)(०१)-जिल्हा पोलीस दल (२०५५०१६८)-१३-कार्यालयीन खर्च" व "२०५५-(००)-१०८ राज्य मुख्यालय पोलीस-(०१)-पोलीस आयुक्त कार्यालय-(०२)(०१) शहर पोलीस (२०५५००९७)-१३ कार्यालयीन खर्च" या लेखाशिर्षाखालील मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा

३ उपरोक्त आदेशाप्रमाणे पोलीस मॅन्युअल भाग-३ मधील नियम क्र.२१२ (१०) मध्ये सुधारणा करण्याची कार्यवाही यथावकाश करण्यात येईल.

४. हे आदेश निर्गमित केल्याचा दिनांकापासून अंमलात येतील.

५. हे आदेश वित्त विभागाने त्यांच्या अनौ.संदर्भ क्र.१४२/०९/व्यय-७, दि.०६.०३.२००९ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

(शि.म.धुळे)
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२) सर्व पोलीस आयुक्त,
३) सर्व पोलीस अधिक्षक,
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई
५) महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर
७) महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-२, नागपूर
८) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
९) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१०) वित्त विभाग, (व्यय-७), मंत्रालय, मुंबई-३२
११) गृह विभाग (बीयुडी-१), मंत्रालय, मुंबई-३२
१२) निवडनस्ती कार्यासन पोल-८